जुनी जिल्हा न्यायालयीन इमारत, यवतमाळ येथे कौटुंबिक न्यायालय, यवतमाळ, कार्यान्वित करण्यासाठी इमारतीचे परीवर्तन, डागडुजी व इतर आवश्यक कामाचे रु.४८,८६,०४३/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांक : कौटुंन्या १११८/प्र.क्र.१३/का.०९

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ११ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :**

१) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र.कौटुंन्या १११६/प्र.क्र.२२२/का.९, दि.१८.०८.२०१७

२) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. B(W) ६०६६ of २०१७/३२१५/३९३७६, दि.१७.०९.२०१६.

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये १४ व्या वित्त आयोगांतर्गत ९ ठिकाणी कौटुंबिक न्यायालय स्थापन करण्यात आले आहे, त्यामध्ये कौटुंबिक न्यायालय, यवतमाळ चा समावेश आहे. सदर न्यायालय जुनी जिल्हा न्यायालयीन इमारत, यवतमाळ येथे कार्यान्वित करण्यासाठी इमारतीचे परीवर्तन, डागडुजी व इतर आवश्यक कामाचे रु. ४५,७५,६९४/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक मा.उच्च न्यायालयाने संदर्भ क्र.२ येथील पत्रासोबत शासनास सादर केले आहे. सदर प्रकरणी सार्वजनिक बांधकाम विभागाने अंदाजपत्रकीय रक्कम परीगणित करुन रु.४८,८६,०४३/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यास सहमती दिलेली आहे. त्यानुसार कौटुंबिक न्यायालय, यवतमाळ हे जुनी जिल्हा न्यायालयीन इमारत, यवतमाळ येथे कार्यान्वित करण्यासाठी इमारतीचे परीवर्तन, डागडुजी व इतर आवश्यक कामाच्या रु.४८,८६,०४३/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन कौटुंबिक न्यायालय, यवतमाळ हे जुनी जिल्हा न्यायालयीन इमारत, यवतमाळ येथे कार्यान्वित करण्यासाठी इमारतीचे परीवर्तन, डागडुजी व इतर आवश्यक कामाच्या रु.४८,८६,०४३/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**२.** सदर प्रकरणी दुरुस्तीचा खर्च मागणी क्र. जे-१, (००) २०१४, न्यायदान, १०२-उच्च न्यायालये (१३) १४ व्या वित्त आयोगांतर्गत योजना (१३)(०२) कौटुंबिक न्यायालये (अनिवार्य) (२०१४ ०६०१) २७-लहान बांधकामे या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

**३.** हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.सं.क्र.६४/इमा-२, दिनांक ३०.०१.२०१८ व त्या विभागाच्या सहमतीने तसेच, वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक १७.०४.२०१५ (वित्तीय अधिकार नियम पुस्तीका-१९७८) मधील भाग-पहीला, उपविभाग ३, अ.क्र.४, परिच्छेद क्र. २७(२)(अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी वित्तीय अधिकाराच्या अटींचे पालन करण्याची व प्रचलित कार्यपद्धतीचा अवलंब करुन व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१५१११२३६१११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2018.10.15 11:17:12 +05'30'

**(अ. श्या. कलोती)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
२. प्रबंधक (निरीक्षणे-१ व २), मा.उच्च न्यायालय, मुंबई
३. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, यवतमाळ
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता १/२), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.
६. उप जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.
७. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
८. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
९. विधी व न्याय विभाग (का.२३/२४/२५), मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती (का-९)